महाराष्ट्र राज्य सहकारी अपील न्यायालय मुंबई खंडपीठ सहकार न्यायालयातील १८५ अस्थायी पदे दि.१/३/२०२५ ते दि.३१/८/२०२५ पर्यत पुढे चालू ठेवण्याबाबत...........

**महाराष्ट्र शासन**
**सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग,**
**शासन निर्णय क्र. अपमु-०२२५/प्र.क्र. ३२७/५ स**
मादाम काम मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
दिनांक :- १७ मार्च, २०२५

**वाचा :-** १) शासन निर्णय, सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र.राजस-१००८/प्र.क्र.५३८/५स, दि.५/५/२०११

२) शासन निर्णय, सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र. राजस-०९२४/प्र.क्र. २०३ /५ स, दि.२३/९/२०२४

३) सहकार आयुक्त व निबंधक, पुणे यांचे पत्र क्र आस्था/कक्ष-१/अस्थायी पदे मुदतवाढ / २०२५ /३५५ , दि.१८/२/२०२५

४) वित्त विभाग शासन निर्णय क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.३/३/२०२५

**<u>शासन निर्णय :-</u>**

सहकार न्यायालयातील वर्ग-१, वर्ग-३ व वर्ग-४ मधील १८५ अस्थायी पदांना संदर्भ क्र.२ अन्वये दि. २८/२/२०२५ पर्यंत पुढे चालू ठेवण्यास मान्यता देण्यात आलेली होती. सदर १८५ अस्थायी पदांना दि.१/३/२०२५ ते दि.३१/८/२०२५ पर्यंत पुढे चालू ठेवण्यास मंजूरी देण्याबाबत सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, पुणे यांनी संदर्भ क्र.३ अन्वये विनंती केली आहे.

सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभागाच्या क्षेत्रिय आस्थापनेवरील पदांच्या सुधारीत आकृतीबंधास उच्चस्तर सचिव समितीने दि.२१/१/२०११ रोजी झालेल्या बैठकीमध्ये मान्यता दिली आहे. त्यानुसार सुधारीत आकृतिबंधाचा शासन निर्णय दि.५/५/२०११ रोजी निर्गमित करण्यात आला असून सुधारीत आकृतिबंधामध्ये उक्त अस्थायी पदांचा समावेश आहे. वित्त विभागाच्या दि.१/९/२००४ च्या शासन निर्णयातील तरतूदीनुसार आकृतीबंधाचा दर तीन वर्षांनी आढावा घेणे आवश्यक आहे. त्यानुसार शासन निर्णय दि.५/५/२०११ नुसार निर्गमित केलेल्या आकृतीबंधास दि.५/५/२०१४ रोजी तीन वर्षे पूर्ण झाली आहेत. सुधारीत आकृतीबंध निश्चित करण्याबाबतचा प्रस्ताव मा.मुख्यसचिवांच्या अध्यक्षतेखालील उच्चस्तर समितीच्या मान्यतेस्तव वित्त विभागास सादर करण्याची कार्यवाही सुरु आहे.

वित्त विभाग, शासन निर्णय दि.३/३/२०२५ नुसार, सर्व प्रशासकीय विभागांना त्यांच्या आकृतीबंधात समाविष्ट असलेल्या तसेच यापूर्वी आढावा मंजूर केल्यानंतर निर्माण करण्यात आलेल्या परंतु त्यांचा समावेश आकृतीबंधात करण्यात आलेला नाही अशा अस्तित्वात असलेल्या सर्व अस्थायी पदांना दि.१/३/२०२५ ते दि.३१/८/२०२५ या कालावधीत मुदतवाढ देण्याचे अधिकार देण्यात आले

आहेत. दरम्यानच्या काळात सुधारित आकृतीबंधास उच्चस्तरीय सचिव समितीची मान्यता घेण्याबाबत सर्व प्रशासकीय विभागांनी दक्षता घ्यावी अशी बाबही शासन निर्णयात नमुद केली आहे.

सबब, शासन निर्णय दि.५/५/२०११ अन्वये निश्चित केलेल्या आकृतिबंधात उक्त पदांचा समावेश आहे, या अटीच्या अधीन राहून सहकार न्यायालयातील १८५ अस्थायी पदांना दि.१/३/२०२५ ते दि.३१/८/२०२५ पर्यत पुढे चालू ठेवण्यास शासन मान्यता देत आहे. सदर पदांची विगतवारी पुढीलप्रमाणे आहे :-

| अ.क्र. | पद | पदांची संख्या |
|---|---|---|
| १ | सहकार न्यायाधीश | १५ |
| २ | लघुलेखक (निम्नश्रेणी) | ३१ |
| ३ | न्यायालयीन लिपिक | ३१ |
| ४ | कनिष्ठ लिपिक-टंकलेखक | ३१ |
| ५ | लेखा लिपिक | २३ |
| ६ | शिपाई | ५४ |
| **एकूण** | | **१८५** |

२. वरील १८५ अस्थायी पदांचे न्यायालयनिहाय विवरणपत्र प्रबंधक, महाराष्ट्र राज्य सहकारी अपिल न्यायालय, मुंबई हे स्वतंत्रपणे प्रसृत करतील.

३. यावर होणारा खर्च "मागणी क्रमांक व्ही-२ २४२५-सहकार, ००१-संचालन व प्रशासन, (०१) संचालन व प्रशासन (०१) (१०) सहकारी न्यायालयासाठी कर्मचारी वर्ग (२४२५ ०१११)" या लेखाशिर्षाखाली दाखवावा व त्याखालील सन २०२५-२०२६ च्या मंजूर तरतुदीतून भागविण्यात यावा.

४. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन निर्णय दि.३/३/२०२५ अन्वये विभागास प्राप्त झालेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्या संगणक सांकेतांक २०२५०३१७१२२३१००९०२ असा आहे व डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PRAVIN RAJARAM MUNDHE

Digitally signed by PRAVIN RAJARAM MUNDHE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=COOPERATION MARKETING AND TEXTILE DEPARTMENT, 2.5.4.20=f2250646a3997378536c4aaa7d636fcdb30a0b8f8913330badb8710a501fc1c5, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=DC78036626EC580D66C0AC502D43AF5F670B5BA13F51213AD071ACD53714A284, cn=PRAVIN RAJARAM MUNDHE
Date: 2025.03.17 12:23:59 +05'30'

**( प्रविण मुंढे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे,
२. सर्व विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था (प्रशासन),
३. सर्व जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था,

४. महाराष्ट्र राज्य सहकारी अपील न्यायालय, मुंबई / पुणे / नागपूर /औरंगाबाद,
५. सर्व सहकारी न्यायालये,द्वारा- प्रबंधक महाराष्ट्र राज्य सहकारी अपिल न्यायालय, मुंबई
६. महालेखापाल, महाराष्ट्र-१ / २, (लेखापरीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर,
७. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई,
८. निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई,
९. जिल्हा कोषागार अधिकारी, रायगड / नाशिक / जळगांव / अहमदनगर / पुणे / सातारा / सांगली / सोलापूर / कोल्हापूर / औरंगाबाद / नांदेड / अमरावती / नागपूर / अकोला / वर्धा / ठाणे / लातूर,
१०. वित्त विभाग (व्यय - २ / अर्थसंकल्प - १९), मंत्रालय, मुंबई.
११. अवर सचिव १५-स / १७-स, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,
१२. निवडनस्ती - कार्यासन ५स.